**केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री आवास योजना (शहरी) अंतर्गत तृतीय पक्ष गुणवत्ता परिक्षण (TPQM) साठी केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला निधी पैकी उर्वरित निधी वितरीत करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : प्रआयो-२०१८/प्र.क्र.१७१/भाग-१/गृनिधो-२**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक : ०५ ऑगस्ट, २०२४.

**वाचा :-** १.गृहनिर्माण व शहरी व्यवहार मंत्रालय, केंद्र शासन यांचे मंजूरी आदेश क्रमांक N-11011/49/2017/HFA-I/V(FTS -9033058), दिनांक 20.03.2020.
२. गृहनिर्माण विभाग, शासन निर्णय क्रमांक प्रआयो-२०१८/प्र.क्र.१७१/ भाग-१/गृनिधो-२, दिनांक १६.०३.२०२२.

**प्रस्तावना:-**

प्रधानमंत्री आवास योजना (शहरी) अंतर्गत तृतीय पक्ष गुणवत्ता परिक्षण (TPQM) साठी Capacity Building Activities करिता वाचा येथील क्रमांक १ येथील केंद्र शासनाच्या मंजूरी आदेशांन्वये एकूण रुपये १,१५,१०,१००/- इतका निधी प्रधानमंत्री आवास योजना (शहरी) अंतर्गत केंद्र शासनाचा हिस्सा म्हणून मंजूर झाला आहे. त्यापैकी रुपये १,०५,९३,०००/- इतका निधी वाचा येथील संदर्भाधीन क्र. २ येथील गृहनिर्माण विभागाच्या दिनांक १६.०३.२०२२ च्या शासन निर्णयान्वये सुकाणू अभिकरणाला वितरीत करण्यात आला आहे. तथापि, केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला उर्वरित रुपये ९,१७,१००/- इतका निधी केंद्र हिश्श्यासाठी (७५%) लेखाशीर्ष २२१६ २९९६, ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) व त्या समरुप राज्य हिश्श्यासाठी (२५ %) लेखाशीर्ष २२१६ ३००७, ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) अंतर्गत रुपये ३,०५,७००/-असे एकूण रुपये १२,२२,८००/- इतका निधी संबंधित अंमलबजावणी यंत्रणांना प्रदान करण्यासाठी सुकाणू अभिकरण म्हणजे महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण (म्हाडा) यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधानमंत्री आवास योजना (शहरी) अंतर्गत तृतीय पक्ष गुणवत्ता परिक्षण (TPQM) साठी Capacity Building Activities करिता केंद्र शासनाच्या संदर्भीय क्रमांक १ येथील आदेशांन्वये करण्यात आलेला केंद्र हिश्श्याचा निधी रुपये ९,१७,१००/- (अक्षरी रुपये नऊ लाख सतरा हजार शंभर फक्त) मागणी क्र. क्यु ३, मुख्य लेखाशीर्ष २२१६, गृहनिर्माण, (०८) सर्वांसाठी गृहनिर्माण (०८) (०१) सर्वांसाठी गृहनिर्माण अंमलबजावणी यंत्रणांना अनुदाने (प्र.म.आ.यो.) केंद्र हिस्सा (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) लेखाशीर्ष २२१६ २९९६ अंतर्गत मंजूर करण्यात येत आहे.

२. सदर केंद्र हिश्श्याच्या समरुप राज्य हिश्श्यासाठी मागणी क्र. क्यु ३ (०८) (०२) सर्वांसाठी गृहनिर्माण अंमलबजावणी यंत्रणांना अनुदाने (प्र.म.आ.यो.) राज्य हिस्सा (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) लेखाशीर्ष २२१६ ३००७, अंतर्गत रुपये ३,०५,७००/- (अक्षरी रुपये तीन लाख पाच हजार सातशे फक्त) इतका निधी मंजूर करण्यात येत आहे.

३. उपरोक्त एकूण रुपये १२,२२,८००/- (अक्षरी रुपये बारा लाख बावीस हजार आठशे फक्त) इतका निधी अंमलबजावणी यंत्रणांना वितरीत करण्यासाठी महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण (म्हाडा) यांना यांन्वये वितरीत करण्यात येत आहे .

४. सदर निधी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, मुंबई यांच्या स्वाक्षरीने अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून आहरित करण्यात यावा. तसेच, सदर निधी ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेला आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावा.

५. प्रस्तुत प्रकरणी, आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण हे राहतील.

६. हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३२८/व्यय-३, दिनांक ०१.०७. २०२४ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०८०५१८०७१८४६०९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJU GULABRAO AMBADEKAR

Digitally signed by RAJU GULABRAO AMBADEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT, 2.5.4.20=b0ca117db55046daef08cffda987ea722840725027a3993410ac98c4bff99fbc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A0EE20C9BC84D1B68846640737AE7DE6E57C4DDDB08701C0FA67003815071B38, cn=RAJU GULABRAO AMBADEKAR
Date: 2024.08.05 18:23:35 +05'30'

**( राजु अंबाडेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन,वांद्रे (पू.) मुंबई -५१.
२. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
३. अभियान संचालक,राज्य अभियान संचालनालय (प्रआयो), गृहनिर्माण भवन, वांद्रे (पू.), मुंबई.
४. आयुक्त आणि संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई.
५. वित्त नियंत्रक, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पू.) मुंबई -५१.
६. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
७. संबंधित आयुक्त, महानगरपालिका/मुख्याधिकारी,नगरपालिका
८. संबंधित कोषागार अधिकारी
९. उपसचिव (व्यय-३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१०. सहसंचालक, लेखा व कोषागारे कॉम्प्युटर सेल, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालय, मुंबई ३२.
११. कार्यासन अधिकारी, अर्थ व लेखा, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१२.निवडनस्ती/गृनिधो-२ कार्यासन, गृहनिर्माण भवन, मंत्रालय, मुंबई -३२.